"आठव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत."
शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., दारव्हा, ता. दारव्हा, जि. यवतमाळ.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. शाभाभा-११२१/प्र.क्र.११/टेक्स-१ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ मे, २०२२

वाचा :-
१. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दि.११.०८.१९९३.
२. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११९३/प्र.क्र.१४९/टेक्स-१,दि.०३.१२.१९९३.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११०४/प्र.क्र.३००/टेक्स-१ (अ), दि.२१.०८.२००४.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११०९/प्र.क्र.८३/टेक्स-१ (अ), दि.३०.०३.२००७.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११०७/प्र.क्र.९३/टेक्स-१ (अ), दि.३०.११.२००७.
६. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११०८/प्र.क्र.७०/टेक्स-१ (अ), दि.३१.०३.२००९.
७. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११०९/प्र.क्र.७०/टेक्स-१ (अ), दि.३१.०३.२०१०.
८.शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-१११०/प्र.क्र.७०/टेक्स-१ (ब), दि.३१.०३.२०११.
९. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-१११२/प्र.क्र.४१/टेक्स-१ (ब), दि.३१.०३.२०१२.
१०. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-१११२/प्र.क्र.७४/टेक्स-१ (ब), दि.३१.०३.२०१२.
११. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-१११२/प्र.क्र.११/टेक्स-१ (अ), दि.३१.०३.२०२२.
१२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं- २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२.

**प्रस्तावना :-**

शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., दारव्हा,ता.दारव्हा, जि.यवतमाळ या सहकारी सूतगिरणीची नोंदणी दि.०४.०२.१९९१ रोजी झाली आहे. दि.२५.११.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये या सूतगिरणीच्या सुधारित प्रकल्प अहवालाची किंमत रु.६०९०.०० लाख इतकी सुधारित करण्यात आली आहे. प्रकल्प अहवालानुसार या सूतगिरणीने रु.३०४.५० लाख सभासद भागभांडवल जमा करणे आवश्यक असून प्रत्यक्षात सूतगिरणीने रु.२४५.४२ लाख सभासद भागभांडवल जमा केले आहे. १:९ प्रमाणानुसार या सहकारी सूतगिरणीला रु.२२०८.७८ लाख शासकीय भागभांडवल सूतगिरणीस अनुज्ञेय ठरते. त्यापैकी या सहकारी सूतगिरणीस रु.१४८६.०८ लाख शासकीय भागभांडवल वितरीत करण्यात आलेले आहे.

सहकारी सूतगिरण्यांना अर्थसहाय्य करण्यासाठी कर्जे व भागभांडवलाचे प्रमाण १:१ ठेवून सभासद भागभांडवलाच्या १:९ प्रमाणात शेतकरी सहकारी सहकारी सूतगिरणी मर्या., दारव्हा, ता.दारव्हा, जि.यवतमाळ या सूतगिरणीस सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.७२२.७० लाख शासकीय भागभांडवल उपलब्ध करुन देण्याबाबत दि.३१.०३.२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. तथापि, तांत्रिक कारणामुळे सदर रक्कम सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वितरीत करता आला नाही. त्यामुळे दि.३१.०३.२०२२ रोजीचा शासन निर्णय रद्द करुन सदर निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासन आता याद्वारे वाचा क्र.११ येथील दि.३१.०३.२०२२ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करीत आहे.

२. शेतकरी सहकारी सहकारी सूतगिरणी मर्या., दारव्हा, ता.दारव्हा, जि.यवतमाळ या सूतगिरणीस रु.७२२.७० लाख (अक्षरी रुपये सात कोटी बावीस लाख सत्तर हजार फक्त) इतकी रक्कम शासकीय भागभांडवल म्हणून खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

अ) सूतगिरणीने कर्जच्या रक्कमेची उचल बँकेकडून केल्यानंतरच शासकिय भागभांडवलाची रक्कम खर्च करण्यासाठी आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांचेकडून वितरीत करण्यात येईल.

ब) सूतगिरणीने २५,२०० चात्यांसाठीच्या प्रकल्पाचे बांधकाम पूर्ण केलेले नाही ते पूर्ण करावे.

क) सूतगिरणीने दीर्घ मुदतीच्या रु.३०४५.०० लाख इतक्या संपूर्ण कर्जाच्या रक्कमेची उचल करून यंत्रसामुग्री प्राप्त करुन घेवून स्थापित करावी.

ड) सूतगिरणीने सन २०२०-२१ व २०२१-२२ चे लेखापरीक्षण करून घ्यावे.

इ) सूतगिरणीचा प्रकल्प बँकेत वटवता येण्याजोगा (Bankable) असल्याचे व प्रकल्प वर्धनक्षम (Viable) असल्याचे बँकेचे पत्र (Firm Sanction Letter) शासनास सादर करावे.

३. सदर शासकीय भागभांडवल शासन निर्णय दि.११.०८.१९९३, दि.२४.०३.१९९९ (अट क्र.५ वगळून) व दि.१०.७.२०१७ मध्ये नमूद अटी व शर्ती तसेच शासकीय भागभांडवलासंदर्भात शासनाने

भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर सूतगिरणीस लागू राहतील या अटीच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

१) प्रस्तुत सूतगिरणींकडून, शासन निर्णय दि.११.०८.१९९३ व दि.२४.०३.१९९९ मधील अटी व शर्तींचे पालन होत आहे, याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी खात्री करावी.

२) शासकीय भागभांडवलाच्या वसुलीबाबत दि.२४.०३.१९९९ रोजीच्या शासन निर्णयातील अ.क्र.५ मध्ये दि.१०.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून त्यानुसार सूतगिरणीने भागभांडवलाचा पहिला हप्ता स्विकारल्यानंतर ५ वर्षांनी किंवा सूतगिरणी सुरु झाल्यानंतर ३ वर्षांनी यापैकी जे आधी घडेल तेव्हापासून उचल केलेल्या भागभांडवलाची परतफेड १/१५ प्रमाणे सुरु करण्यात येईल आणि असे न केल्यास त्यावर दरसाल दर शेकडा १२% प्रमाणे व्याज आकारण्यात येईल.

३) आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी सदर सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतच्या प्रगतीचा तिमाही अहवाल विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

४) प्रस्तुत सूतगिरणीसंदर्भात शासन निर्णयामधील तरतुदीनुसार वसुलीबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी.

५) आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी पुढील ३ महिन्यांत सदर सूतगिरणीच्या विद्यमान संचालक मंडळाकडून प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत रकमेच्या १०% इतक्या वैयक्तिक मत्तेचे तारण मिळवावे. जोपर्यंत असे वैयक्तिक तारण प्राप्त होणार नाही तोपर्यंत प्रस्तुत वितरीत रक्कम सूतगिरणीस खर्च करता येणार नाही तसेच तोपर्यंत या आदेशाद्वारे मंजूर केलेल्या रकमेवर सूतगिरणीस अधिकर्ष (overdraft) काढून रक्कम खर्च करता येणार नाही असे बंधन आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी संबंधित बँकेवर घालावे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी काटेकोरपणे व तातडीने कार्यवाही करावी.

६) या आदेशानंतर प्रस्तुत सूतगिरणीच्या संचालक मंडळाची निवडणूक झाल्यास, नवनियुक्त संचालक मंडळाने शासकीय भागभांडवलाच्या १०% इतके वैयक्तिक मालमत्तेचे तारण भरल्याशिवाय नवीन संचालक मंडळ अस्तित्वात येणार नाही. पुर्वीच्या संचालक मंडळाने काही गैरव्यवहार केला नसेल किंवा त्यांच्या विरुध्द गुन्हा दाखल झाला नसेल तरच नवनियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतरच पूर्वीच्या संचालक मंडळाचे वैयक्तिक तारण मुक्त करण्यात येईल, अशी सुधारणा संस्थेच्या By - Laws मध्ये करण्याची कार्यवाही आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करावी.

७) सूतगिरणींच्या प्रकल्पास मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाच्या Financial Closer चा पुरावा शासनास सादर केल्याशिवाय शासनाचा हिस्सा देता येणार नाही. त्यामुळे त्याबाबतची खात्री आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करुन घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

८) प्रस्तुत सूतगिरणीकडे बँकेत जमा असलेल्या निधीचे नियोजन करुन कार्यक्षमतेने विनियोग करीत असल्याची खात्री आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करावी.

९) प्रस्तुत सूतगिरणीने कर्जाची उचल करुन त्याचा विनियोग प्रकल्प उभारणीसाठी करुन लवकर प्रकल्प पूर्ण करावा याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण ठेवावे.

१०) प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबीवर होणारा जास्तीचा खर्च सूतगिरणी स्वनिधीतून करील या अटीवर शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी तशी कार्यवाही करावी.

११) सदर सूतगिरणीच्या खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे अदा करावी. निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रीम अदा करण्यात येऊ नये याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी खात्री करावी.

१२) सूतगिरणीस प्राप्त झालेल्या भागभांडवलाचा तसेच शिल्लक रकमेचा सूतगिरणी योग्य प्रकारे विनियोग करते किंवा नाही याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण ठेवावे.

१३) सूतगिरणीने भांडवली वस्तु खरेदी करण्यापूर्वी यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची यथास्थित नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात यावी. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण करावे.

१४) प्रस्तुत सूतगिरणीने खरेदी केलेल्या वस्तू प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा करावे. याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण करावे.

१५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६ व शासन निर्णय क्र. भांखस २०१७/ प्र.क्र.२०४/ उद्योग-४, दि.०८.१२.२०१७ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

१६) सूतगिरणीची उभारणी विहित कालमर्यादेत पूर्ण करावी.

१७) दि.१७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या राजपत्रान्वये राज्यातील सहकारी संस्थांवर दोन शासकीय सदस्य नेमण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून सदर निर्णय या सूतगिरणीस बंधनकारक राहील.

१८) सदर सूतगिरणीच्या सर्व सभासदाने त्यांचे आधार कार्ड नंबर लिंक करणे बंधनकारक राहिल.

१९) सूतगिरणी उभारण्यासाठी ५:४५:५० या आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य देण्यात येते. त्यानुसार सूतगिरणीने ५% सभासद भागभांडवल उभारणे बंधनकारक असून सदर सभासद भागभांगभाडवलाची रक्कम सूतगिरणीच्या प्रयोजनाव्यतिरक्त अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी खर्च करता येणार नाही. तसेच शासनाकडून सूतगिरणीला मंजूर करण्यात येणाऱ्या ४५% शासकीय भागभांडवलाच्या रक्कमेचा विनियोग करताना सूतगिरणीने ५०% रक्कम वित्तीय संस्थेकडून कर्ज म्हणून मंजूर करुन घेतलेली असणे आवश्यक आहे.

२०) या सूतगिरणीस मिळालेले अर्थसहाय्य हे सूतगिरणीचा प्रकल्प पूर्ण करण्यासाठीच उपयोगात आणणे सूतगिरणीवर बंधनकारक राहील. या अर्थसहाय्याचा दुरुपयोग केल्यास, संस्थेच्या संचालक मंडळावर कायदेशीर कारवाई करण्यात येईल व संस्थेला दिलेले अर्थसहाय्य एकरकमी वसूल करण्यात येईल. तसेच अशा प्रकरणी संबंधित संचालक मंडळास व्यक्तिशः

जबाबदार धरण्यात येईल. त्यामुळे सूतगिरणीच्या संचालक मंडळाने सूतगिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेल्या शासकीय भागभांडवलाची रक्कम रु.७२२.७० लाख (अक्षरी रुपये सात कोटी बावीस लाख सत्तर हजार फक्त) इतकी रक्कम शेतकरी सहकारी सहकारी सूतगिरणी मर्या., दारव्हा, ता.दारव्हा, जि.यवतमाळ या सूतगिरणीच्या पुसद अर्बन को- ऑपरेटिव्ह बँक लि., पुसद, शाखा दारव्हा या बँकेच्या खाते क्र.०००४००७४०००१५५८, IFSC Code-PUSD००००००४ या मध्ये RTGS द्वारे जमा करावी. सूतगिरणीने प्रकल्प पूर्ण करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चासंदर्भात, शासन निर्णय दि.१५.०६.२००६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची मान्यता घ्यावी.

५. वित्त विभाग, शासन निर्णय दि.०४.०४.२०२२ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ येथील "३२-अंशदाने" या बाबीखाली खर्च करण्यास वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली असून या बाबीखालील अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.

६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१०.०५.२०१६ मधील परिच्छेद- ब (२) येथे नमूद केल्यानुसार प्रस्तुत प्रकरणास वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली आहे. तसेच या परिपत्रकातील परिच्छेद-ब (३) नुसार, वित्त विभाग शासन निर्णय दि.०४.०४.२०२२ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सुचीमधील असलेल्या मुद्दयांची पूर्तता या प्रकरणी होत आहे.

७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१०.०५.२०१६ मधील परिच्छेद- अ नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे:-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:- वित्त विभाग, शासन निर्णय दि.०४.०४.२०२२ अन्वये "३२ अंशदाने" या बाबीखाली खर्च करण्यास वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली असून या बाबीखालील अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.

२) "मागणी क्र. व्ही-३, ४४२५ - सहकारावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (००)(०५) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम), (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने"" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु.८०००.०० लाख तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:- होय.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही:- या योजनेखाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे:- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे:- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा:- सूतगिरणीच्या स्थापत्य बांधकामाच्या निविदांना मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीची मान्यता घेऊनच सूतगिरणीने बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी करणे बंधनकारक आहे.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत:- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

९) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा:- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी :- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

८. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु.७२२.७० लाख (अक्षरी रुपये सात कोटी बावीस लाख सत्तर हजार फक्त) इतक्या शासकीय भागभांडवलाचा खर्च "मागणी क्र. व्ही-३, ४४२५ - सहकारावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (००)(०५) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम), (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

९. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु.७२२.७० लाख (अक्षरी रुपये सात कोटी बावीस लाख सत्तर हजार फक्त) इतकी रक्कम शेतकारी सहकारी सूतगिरणी मर्या., दारव्हा, जि.यवतमाळ या सूतगिरणीच्या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन सूतगिरणीच्या पुसद अर्बन को- ऑपरेटिव्ह बँक लि., पुसद, शाखा दारव्हा या बँकेच्या खाते क्र.०००४००७४०००१५५८, IFSC Code- PUSD०००००४ मध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री.सु.पु. पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री.स.दि. खरात, उप सचिव (सूतगिरणी), (V०००९), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी"म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय, वित्त विभाग दि.०४.०४.२०२२ चे शासन निर्णय, नियोजन विभागाच्या व वित्त विभागाचा सहमतीने तसेच वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.२८७/२०२२/व्यय-१४, दि.०५.०५.२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१३१२४३२१५७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUJATA MAYUR BHAVSAR

Digitally signed by SUJATA MAYUR BHAVSAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=409e9774a7d1ea9c8d3e125716d4e57b62e42f958e738b4526fe909870e0fb38, pseudonym=8898E599D33E9A46BFFFE44B288C3272AA93777D, serialNumber=3E1E426F74F1978EA7797E86DAB9645CCFC7C08D9F395ABD71E88BAEB3731288, cn=SUJATA MAYUR BHAVSAR
Date: 2022.05.13 12:46:18 +05'30'

**(सुजाता भावसार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
४. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (४ प्रती).
५. अवर सचिव, १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
६. कार्यासन अधिकारी (व्यय-२ / अर्थसंकल्प-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. कार्यासन अधिकारी (कार्यासन-१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. आयुक्त, वस्त्रोद्योग,महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०.प्रादेशिक उपायुक्त, वस्त्रोद्योग, सोलापूर.
११.जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर.
१२.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१४.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती).
१५.व्यवस्थापक, यवतमाळ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या, यवतमाळ, शाखा बोरीअरब.
१६.महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१.
१७.अध्यक्ष, शेतकरी सहकारी सहकारी सूतगिरणी मर्या., दारव्हा, ता.दारव्हा, जि.यवतमाळ.
१८. निवड नस्ती (टेक्स १ अ).